**राजर्षि छत्रपती शाहू महाराज यांचा दिनांक**
**२६ जून हा जन्मदिवस साजरा करण्याकरीता**
**विशेष उपक्रम राबविणेबाबत**

## महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१५/प्र.क्र.१३५/बांधकामे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४००० ०३२
तारीखः २२ जुन,२०१५

<u>वाचा :-</u>

1) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २००२/प्र.क्र.२५८/ मावक-२, दि.१४ जुलै,२००३**
2) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २००६/प्र.क्र.१८६/मावक-२, दि. २८ एप्रिल,२००६**

<u>प्रस्तावना :-</u>

१. राजर्षि छत्रपती शाहू महाराज यांच्या कार्यकाळात ते सामाजिक न्याय प्रस्थापनेसाठी सदैव दक्ष होते. समाजातील दुर्लक्षित मागासवर्गीय दुर्बल घटकांच्याप्रती त्यांचा दृष्टीकोन विशेष सहानुभूती व सुधारणावादी होता. मागासगर्वीय अपंग, वृध्द, निराधार, दुर्बल इत्यादी घटकांच्या कल्याणार्थ त्यांनी अनेक निर्णय अंमलात आणले. त्यांचा आदर्श समाजापुढे विशेषत्वाने यावा, या दृष्टीकोनातून त्यांचा जन्मदिवस दिनांक २६ जून हा प्रतिवर्षी “सामाजिक न्याय दिन” म्हणून साजरा करण्यात येतो.

२. राजर्षि छत्रपती शाहू महाराजांचा सामाजिक न्याय प्रस्थापनेचा दृष्टीकोन लक्षात घेऊन दिनांक २६ जून हा त्यांचा जन्मदिवस “सामाजिक न्याय दिन” म्हणून साजरा करताना विविध कार्यक्रमाचे आयोजन करण्याबाबतच्या सूचना संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१४ जुलै, २००३ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या आहेत. त्यानुसार विविध कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येते. सदरहू सामाजिक न्याय दिन अधिक लोकाभिमुख होण्याच्या दृष्टीने व जनतेमध्ये सामाजिक न्यायाच्या प्रती अधिक जागरुकता निर्माण व्हावी म्हणून काही विशेष उपक्रम राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे :-

## शासन निर्णय:-

१. दरवर्षी दि.२६ जून या सामाजिक न्याय दिनी प्रत्येक जिल्हयाच्या जिल्हाधिकारी यांनी अनुसूचित जाती जमाती अत्याचार प्रतिबंधक अधिनियमांतर्गत प्रलंबित प्रकरणाचा आढावा घ्यावा व प्रलंबित प्रकरणांचा निपटारा जलद गतीने होण्याच्या दृष्टीने विशेष मोहिम हाती घ्यावी.

२. दि.२६ जून या सामाजिक न्याय दिनाचे औचित्य साधून प्रत्येक जिल्हयाच्या ठिकाणी संविधान जनजागृती अभियान राबविण्यात यावे. प्रत्येक जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी

जिल्हयाच्या ठिकाणी समता दिंडीचे आयोजन करावे. याकरीता विविध शैक्षणिक संस्था व शासकीय कार्यालयांच्या प्रमुखांशी समन्वय साधण्यात यावा व समता दिंडीमध्ये, चित्ररथ, शाहू महाराजांचे व इतर राष्ट्रपुरुषांचे सुविचार फलक लावण्यात यावे. तसेच अस्पृश्यता निर्मूलनाबाबत घोषणावाक्याचा अंतर्भाव असावा. समता दिंडीच्या माध्यमातून नागरिकांचे मूलभूत अधिकार व कर्तव्ये याबाबत जनजागृती होण्याच्या दृष्टीने घटनेतील विविध अनुच्छेद उदा. कायदयासमोर समानता, भेदभाव प्रतिबंध, अस्पृश्यता प्रतिबंध, अभिव्यक्ती स्वातंत्र्याचे अधिकार व कर्तव्याची माहिती देण्यात यावी. कार्यक्रमाच्या ठिकाणी राजर्षि छत्रपती शाहू महाराजांच्या कार्यावर आधारित चित्रफित दाखविण्यात यावी. तसेच व्याख्याने, पोवाडे, भाषणे इत्यादींच्या माध्यमातून सामाजिक न्यायचे महत्व पटवून देण्यात यावे.

३. संविधान जनजागृती प्रभातफेरीची सुरुवात जिल्हाधिकारी यांच्या उपस्थितीत करावी व आयोजन सहाय्यक, आयुक्त, समाजकल्याण यांनी करावे.

४. उपरोक्त संदर्भ क्र. १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राजर्षि छत्रपती शाहू महाराज जयंती दिन “सामाजिक न्याय दिन” म्हणून साजरा करण्याच्या अनुषंगाने कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

५. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी सामाजिक न्याय दिन साजरा केल्याचा सविस्तर अहवाल आवश्यक त्या तपशिलासह प्रादेशिक उपआयुक्त, समाजकल्याण यांचेमार्फत आयुक्त, समाजकल्याण यांना दि. ३१ ऑगस्ट पर्यंत सादर करावा व आयुक्त, समाजकल्याण यांनी दिनांक १५ सप्टेंबर पर्यंत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२५१३०८४५१६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2015.06.25 13:52:40 +05'30'

**( दि.रा. डिंगळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१.मा.राज्यपालांचे सचिव
२.मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३.मा.अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग,
४.आयुक्त समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

५.सर्व जिल्हाधिकारी,
६.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
७.संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इ.मा.व, महाराष्ट्र राज्य,पुणे
८.आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
९.संचालक, क्रिडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे
१०सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१२. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१३.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. सर्व कार्यसने, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,